**रामेती,नाशिक संस्थेतील विविध प्रकारची दुरुस्ती तसेच नूतनीकरण करण्याकरिता प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करुन देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१६५/३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १५ मार्च, २०२४

**वाचा :**

१. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक यांचे पत्र क्र. जा.क्र.का-३/प्र.मा./इमा/५७७/सन २०२४, दि. ३१.०१.२०२४
२. संचालक, वनामती यांचे पत्र क्र. वनामती/बांधकाम/निधी मागणी/२५००/२०२३, दि.१२.०७.२०२३
३. संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. कृआ.पुणे/नस्ती/आत्मा (वि.प्र.५)शाखा/प्र.क्र.१२/२८/२४, दि. १४.०२.२०२४

**प्रस्तावना :-**

राज्यातील कृषि विकास घटकाचे महत्व लक्षात घेऊन कृषि आणि कृषिशी निगडीत विषयाबाबत अद्यावत प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीने नागपूर येथे वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, ही संस्था शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित करण्यात आली आणि राज्यातील नागपूर, पुणे, छत्रपती संभाजीनगर, अमरावती, नाशिक, कोल्हापूर व खोपोली येथील सात प्रशिक्षण संस्था या शिखर प्रशिक्षण संस्थेच्या सहकारी व संलग्न संस्था म्हणून घोषित करण्यात आल्या आहेत. तसेच, दिनांक १७ जुलै,२००१ च्या शासन निर्णयानुसार नागपूर येथील शिखर प्रशिक्षण संस्था आणि तिच्या विभागीय सात संलग्न संस्था स्वायत्त संस्था म्हणून घोषित करण्यात आल्या.

रामेती नाशिक संस्थेतील वसतिगृह दुरुस्ती/ नुतनीकरण, प्रशिक्षण हॉल विस्तार व मुख्य इमारतीवर मिनारचे बांधकाम करण्यासाठी सन २०२३-२४ मध्ये वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम), लेखाशिर्ष २४०१ २६४९ या अंतर्गत रु.७०,००,०००/- च्या खर्चास प्रशासकीय मान्यता देवून सदर निधी उपलब्ध करुन देणेबाबत संचालक, वनामती यांनी संदर्भाधीन दि.१२.०७.२०२३ रोजीच्या पत्रान्वये संचालक(आत्मा) यांना प्रस्ताव सादर केला होता. त्यानुषंगाने संचालक(आत्मा) यांनी संदर्भाधीन दि. २४.०७.२०२३ रोजीच्या पत्रान्वये सदर प्रकरणी रु.७०,००,०००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत व सदरचा निधी उपलब्ध करुन देण्याची शासनास विनंती केली आहे. मुख्य

अभियंता(स्थापत्य), सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक यांनी रु.७०,००,०००/- इतक्या रकमेच्या सविस्तर अंदाजपत्रकास दि.०१.०२.२०२४ रोजीच्या आदेशान्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे.

सन २०२३-२४ मध्ये वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम), लेखाशिर्ष २४०१ २६४९ या अंतर्गत रु.६००.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे.

त्यानुषंगाने रामेती, नाशिक संस्थेतील वसतिगृह दुरुस्ती, नुतनीकरण, प्रशिक्षण हॉल विस्तार व मुख्य इमारतीवर मिनारचे बांधकाम करण्यासाठी २०२३-२४ मध्ये वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम), लेखाशिर्ष २४०१ २६४९ या अंतर्गत रु.७०,००,०००/- (एकूण रुपये सत्तर लक्ष फक्त) च्या खर्चास प्रशासकीय मान्यता देवून सदर बाबीकरिता निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णय :-**

१. रामेती, नाशिक संस्थेतील वसतिगृह दुरुस्ती, नुतनीकरण, प्रशिक्षण हॉल विस्तार व मुख्य इमारतीवर मिनारचे बांधकाम करण्यासाठी सन २०२३-२४ मध्ये वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम), लेखाशिर्ष २४०१ २६४९ या अंतर्गत रु.७०,००,०००/- (रुपये सत्तर लक्ष फक्त) इतक्या खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर बाबीकरिता रू.१०.०० लक्ष (रू. दहा लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी चालू वर्षी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र. डी-३, २४०१, पीक संवर्धन, १०९ विस्तार व प्रशिक्षण, (०१)(४७)
वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम) ३१,
सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) ( २४०१ २६४९ )

३. या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात आलेल्या रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता पुढील अधिका-यांना नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | वनामती स्तर | संचालक वनामती, नागपूर | वनामती नागपूर कार्यालयातील वरिष्ठ प्रशासन नि .लेखा अधिकारी. |

४. वितरीत केलेला निधी तातडीने खर्च करावा व वितरीत केलेला निधी बँक खात्यावर पडून राहणार नाही याची दक्षता घ्यावी.

५. निधी खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. सदर वितरीत निधीच्या अंतर्गत झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनाकडे सादर करण्याची कार्यवाही संचालक(आत्मा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावी.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१५३/का.१४३१, दि.०१.०३.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.९४/२०२४/व्यय१, दि.१२.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१८१०३५३९८१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.03.18 10:45:53 +05'30'

**(महेंद्र घाडगे)**
**अवर सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति-**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
३. आयुक्त (कृषि ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
५. संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
९. सर्व विभागीय कृषी सह संचालक
१०.सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
११.सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई,
१२. प्राचार्य, प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती), नाशिक
१३. वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई-३२
१४. नियोजन विभाग का.१४३१, मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवड नस्ती ३-अे

****